**श्री.इजाज अहमद शरीक मसलत कमुरुद्दीन, गटविकास अधिकारी, पंचायत समिती, कुडाळ, जि. सिंधुदुर्ग यांची महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोगावर अवर सचिव या पदी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रतिनि २०१५/प्र.क्र.७०/का-९**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: २९/०७/२०१५

**संदर्भ -**

ग्राम विकास व जलसंधारण विभागाचे क्र.मविसे-२०१५/प्र.क्र.१६९/२०१५/आस्था-३, दिनांक १४-७-२०१५ रोजीचे पत्र.

**शासन निर्णय-**

श्री.इजाज अहमद शरीक मसलत कमुरुद्दीन(वेतनश्रेणी (पीबी-३) १५६००-३९१००+ग्रेड पे ५४००) गटविकास अधिकारी, पंचायत समिती, कुडाळ, जि. सिंधुदुर्ग यांची महाराष्ट्र नागरी सेवा (स्वीयेत्तर सेवा) नियम, १९८१ मधील परिशिष्ट तीन (१) तरतूदीनुसार अवर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोग,मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती तीन वर्षासाठी पुढील अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

अ) श्री. इजाज अहमद शरीक मसलत कमुरुद्दीन, अवर सचिव, महाराष्ट्र राज्य, अल्पसंख्यांक आयोग यांच्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती बाबतचे आदेश ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांच्याशी विचार विनिमय करुन यथावकाश निर्गमित करण्यात येतील.

ब) श्री. इजाज अहमद शरीक मसलत कमुरुद्दीन यांना अवर सचिव,महाराष्ट्र राज्य, अल्पसंख्यांक आयोग या पदाची वेतनश्रेणी १५६००-३९१००+ग्रेड पे ६६०० असल्यामुळे सदर वेतनश्रेणी देय राहणार नाही. तथापि, सध्या ते कार्यरत असलेल्या गटविकास अधिकारी, पंचायत समिती, कुडाळ, जि. सिंधुदुर्ग या पदाची (वेतनश्रेणी (पीबी-३) १५६००-३९१००+ग्रेड पे ५४००) वेतनश्रेणी व सदर पदावरील देय असणारे भत्ते त्यांना देय राहतील.

क) त्यांना तसेच अवर सचिव, महाराष्ट्र अल्पसंख्यांक आयोग या पदाच्या प्रतिनियुक्तीसाठी कोणताही प्रतिनियुक्ती भत्ता देण्यात येणार नाही.

२. सदर शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १४-७-२०१५ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या सहमतीस तसेच शासन मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे. श्री. इजाज अहमद शरीक मसलत कमुरुद्दीन यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी ग्राम विकास व जलसंधारण विभागामार्फत हाताळण्यात येतील.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यायत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१५०७२९१७४७२४५२१४ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

Ashok Hari Gaikwad

Digitally signed by Ashok Hari Gaikwad
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Hari Gaikwad
Date: 2015.07.29 17:51:03 +05'30'

(अशोक गायकवाड)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) मा.मंत्री (अविवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.राज्यमंत्री (अ.वि.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
६) प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
८) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग
१०) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
११) संचालक, लेखा व कोषागारे,
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१४) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
१५) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१६) निवडनस्ती (कार्यासन-९)